कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.

**कै. (श्री.) बालाजी गोपीनाथ राठोड, उप शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२४/प्र.क्र.९१/टीएनटी-६**
: MSC-16014/18/2025-MSC-(TNT-6)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २० मे, २०२५

**संदर्भ :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. रत्नागिरी यांचे पत्र क्र.रजिप/शिक्षण/अ-६/७६८६/२०२४, दि.०१/०८/२०२४,
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/ संकीर्ण/६०६१/२०२४, दिनांक ११/०९/२०२४
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,रत्नागिरी यांचे पत्र क्र. क्र.रजिप/शिक्षण/अ-६/३१६३/२०२४, दि.२०/०३/२०२४

**ज्ञापन :-**

कै. (श्री.) बालाजी गोपीनाथ राठोड, उप शिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, ओरी तिवराड, ता. जि. रत्नागिरी यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०४/०६/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै. (श्री.) बालाजी गोपीनाथ राठोड, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. सोलापूर यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. कै. (श्री.) बालाजी गोपीनाथ राठोड, उप शिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, ओरी तिवराड, ता. जि. रत्नागिरी येथे दिनांक ०३/०५/२०१९ पासून कार्यरत होते.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी दिनांक ३०/०४/२०२१ रोजी झालेल्या व्ही. सी. द्वारे दिलेल्या सुचनांच्या अनुषंगाने गट विकास अधिकारी, (वर्ग-१) यांनी त्यांचे दि.३०/४/२०२१ च्या आदेशान्वये पंचायत समिती, रत्नागिरी क्षेत्रातील गावातील कोव्हिड-१९ प्रतिबंधात्मक उपाययोजनासाठी सर्व शिक्षक, तलाठी, ग्रामसेवक, आशा, अंगणवाडी सेविका व ग्राम कृतीदलातील सदस्य तसेच ग्रामपंचायतीचे सदस्य यांची मदत घेवून “माझी रत्नागिरी माझी जबाबदारी”

या अभियानाची प्रभावीपणे अंमलबजावणी दिनांक ०३/०५/२०२१ पासून करण्याकरिता आदेशित केले होते. उक्त आदेशाच्या अनुषंगाने ग्रामविकास अधिकारी व सरपंच ओरी ता. जि. रत्नागिरी यांचे संयुक्त आदेशान्वये श्री. राठोड यांची दिनांक ०३/०५/२०२१ रोजी मोहिम पथक क्र. २ मध्ये तिवराडवाडी, ता. जि. रत्नागिरी येथे नियुक्ती करण्यात आली होती. उक्त आदेशाच्या अनुषंगाने कै. (श्री.) राठोड हे दिनांक ०३/०५/२०२१ रोजी कार्यरत असल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी प्रमाणित केले आहे.

५. कै. (श्री.) राठोड यांची दि. १४/०५/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे दिसून येते. कै.(श्री.) राठोड यांचे दिनांक १४/०५/२०२१ ते दिनांक २०/०५/२०२१ या कालावधीत श्रीदत्त हॉस्पीटल व अतिदक्षता विभाग, अहमदपूर जि. लातूर येथे उपचार करण्यात आले. पुढील उपचार दि.२०/०५/२०२१ ते दि. २७/०५/२०२१ रोजी स्पंदन हॉस्पीटल, लातूर येथे करण्यात आले आहेत व त्यापुढील दि. २७/०५/२०२१ ते दि. ०४/०६/२०२१ या कालावधीत विरीनची हॉस्पीटल, हैद्राबाद, तेलंगणा राज्य येथे करण्यात आले आहेत. कै. (श्री.) राठोड यांचा दिनांक ०४/०६/२०२१ रोजी कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, विरीनची हॉस्पीटल, हैद्राबाद, तेलंगणा यांनी प्रमाणित केले आहे.

६. कै. (श्री.) बालाजी गोपीनाथ राठोड हे जि. प. शाळा ओरी तिवराड, ता.जि. रत्नागिरी हे गट विकास अधिकारी यांचे दिनांक ३०/०४/२०२१ च्या आदेशानुसार माझे कुटुंब माझी जबाबदारी या कर्तव्याकरिता दिनांक ०३/०५/२०२१ रोजी कार्यरत असून त्यांचा दि.१४/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ अहवाल पॉझिटीव्ह आला असून दिनांक ०४/०६/२०२१ रोजी मृत्यु झाला आहे आहे. त्यानुसार कै. (श्री.) राठोड ह्या दवाखान्यात दाखल होण्याअगोदर अथवा मृत्युच्या १४ दिवस अगोदर कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर असल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी प्रमाणित केले आहे.

७. कै. (श्री.) राठोड यांचा दिनांक ०४/०६/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र महानगरपालिका , ग्रेटर हैद्राबाद यांनी सादर केले आहे.

८. तसेच, कै. (श्री.) राठोड यांच्या पत्नी श्रीम. संगीता बालाजी राठोड यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत विनंती केली आहे. सबब, कै. (श्री.) राठोड यांच्या वारसास वित्त विभागाच्या दि.२९/०५/२०२० च्या शासन निर्णयान्वये रु.५० लक्ष रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात कवच मिळावे असा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी शिफारशीसह सादर केला आहे.

९. मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, लोहा जि. नांदेड यांनी, कै. (श्री.) राठोड यांचे कायदेशीर वारस म्हणून (१) छबुबाई गोपीनाथ राठोड (२) श्रीम. संगीता बालाजी राठोड (३) सुजित बालाजी राठोड (४) सुमीत बालाजी राठोड यांना घोषित केले आहे.

१०. कै. (श्री.) बालाजी गोपीनाथ राठोड, उप शिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, ओरी तिवराड, ता. जि. रत्नागिरी यांना २२०२-०१७३- ३६ (वेतन) या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी प्रमाणित केले आहे.

११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी, वैद्यकीय अधिक्षक, विरीनची हॉस्पीटल, हैद्राबाद, तेलंगणा यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा. सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, लोहा जि. नांदेड यांनी, कै. (श्री.) राठोड यांचे कायदेशीर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) छबुबाई गोपीनाथ राठोड (२) श्रीम. संगीता बालाजी राठोड (३) सुजित बालाजी राठोड (४) सुमीत बालाजी राठोड यांना एकत्रित रु.५० लक्ष ( रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र.५८८/व्यय-५, दि.२५/०४/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

१३. सदर निधि वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी प्रत्यक्षपणे संबंधितांना वितरित करण्यात आल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करण्यात यावी.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०५२२१८२९३८१९२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APPASING
RAMSING RAJPUT

Digitally signed by APPASING RAMSING RAJPUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education and Sports, 2.5.4.20=81C03748EA91B5CA6EB76216FADD8CFC070967B2826BADC6BA66DC8151A5B97A, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02486C751E1117F7DF4BDEA131CC54D2A4486AA35E5AB82CE788466F2EC90916, cn=APPASING RAMSING RAJPUT
Date: 2025.05.22 18:30:34 +05'30'

**( आ. रा. राजपूत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), रत्नागिरी

प्रत माहितीसाठी :-

१. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई

२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती संगीता बालाजी राठोड, १५५, सुजित निवास, नेहरु नगर, येलदरी तांडा, लिंबोटी ता. लोहा जि. नांदेड-४३१७०८
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.९१/२०२४)